

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

६८) श्री कनकधारा स्तोत्रम् -१

अङ्गं हरेः पुलकभूषणमाश्रयन्ती भृङ्गाङ्गनेव मुकुलाभरणं तमालम्।

अङ्गीकृताऽखिल-विभूतिरपाङ्गलीला माङ्गल्यदाऽस्तु मम मङ्गलदेवतायाः ।।१।।

भगवान जगद्गुरु आदी शंकराचार्य स्वामी महाराज भिक्षा मागण्यासाठी गेले असता एका मातेची अत्यंतिक गरिबी पाहून द्रवलेल्या त्यांच्या मनात हे स्तोत्र स्फुरले आहे अशी कथा आहे.

आरंभी आचार्यश्री आई जगदंबा महालक्ष्मीच्या कृपादृष्टी चे वर्णन करीत आहेत. कशी आहे ही कृपादृष्टी?

भृङ्गाङ्गनेव मुकुलाभरणं तमालम्- जशी एखादी भृंगांगणा म्हणजे भ्रमरी, मुकुल अर्धवट उमललेल्या कळ्यांनी डवरलेल्या तमाल वृक्षावर वारंवार घुटमळत राहते. तशी,

अङ्गं हरेः पुलकभूषणमाश्रयन्ती भृङ्गाङ्गनेव- आई जगदंबेची दृष्टी, अंगावर रोमांच फुललेल्या भगवान श्रीहरी यांच्या अंगावर सतत जात असते.

भ्रमरी जशी सतत झाडावर बसून राहत नाही तशी ती दृष्टी टक लावून पहात नाही. पण जशी ती झाडाला सोडून दुसरीकडे जातही नाही तशी आईची दृष्टी अन्यत्र वळत ही नाही. नेत्र कटाक्षातील चंचलतेचे सौंदर्य आणि श्रीहरी पाशी असणारी स्थिरता दोन्ही गोष्टी आचार्यांनी एकत्र दाखविल्या आहेत.

अङ्गीकृताऽखिल-विभूतिरपाङ्गलीला- अशी ती अपांगलीला म्हणजे डोळ्याच्या कोपऱ्यातून हळूच तिरपे पाहणे, संपूर्ण विश्वातील विभूतीला अर्थात संपूर्ण सौंदर्यपूर्ण गोष्टींच्या संग्रहाला धारण करते. अर्थात जगातील सर्व सौंदर्य हे एका बाजूला आणि आईच्या दृष्टीचे सौंदर्य एका बाजूला.

माङ्गल्यदाऽस्तु मम मङ्गलदेवतायाः- अशी माझ्या मंगल देवतेची दृष्टी मला मांगल्य प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

६९) श्री कनकधारा स्तोत्रम्-२

मुग्धा मुहुर्विदधती वदने मुरारेः प्रेमत्रपा-प्रणहितानि गताऽऽगतानि।

मालादृशोर्मधुकरीव महोत्पले या सा मे श्रियं दिशतु सागरसम्भवायाः ।।२।।

मुग्धा - अत्यंत शुद्ध,निर्मल, सरल, निष्पाप, अबोध. आई महालक्ष्मीची दृष्टी अशी आहे.

मुहुर्विदधती वदने मुरारेः- ती दृष्टी वारंवार भगवान मुरारी अर्थात मुर राक्षसाचे शत्रू भगवान श्रीहरींच्या मुखकमलावर जात असते.

गताऽऽगतानि- जात राहते .येत राहते. ही आचार्यश्री ची रचना मोठी सुंदर आहे. आईची दृष्टी भगवंताच्या मुखावर जाते .परत येते. पुन्हा जाते. पुन्हा येते. यामध्ये तिच्या चांचल्य गुणाचा भाग आहे तसाच सौंदर्याचा देखील.

ती दृष्टी स्थिर का नाही? याचे नितांत सुंदर वर्णन करताना आचार्य श्री कारण देतात,

प्रेमत्रपा-प्रणहितानि- ची दृष्टी प्रेम आणि लज्जा यांनी भरलेली आहे. श्रीहरींवर उत्कट प्रेम असल्याने ती दृष्टी भगवंताच्या मुखकमलाकडे जाते आणि दृष्टादृष्ट होताच त्रपा लज्जेने आईची दृष्टी खाली वळते. असे नितांत रमणीय दृश्य आचार्य वर्णन करीत आहेत.

त्याच सौंदर्याला उपमा देताना ते म्हणतात,

मालादृशोर्मधुकरीव महोत्पले या- एखाद्या महोत्पल म्हणजे पूर्णप्रफुल्लित कमळावर मधुकरींची रांग यावी तशी. वास्तविक येथे फक्त आई लक्ष्मीचीच दृष्टी आहे. पण तीच वारंवार जाणे-येणे करत असल्याने जणू काही रांग वाटत आहे. सातत्याने त्या दृष्टीचे आवागमन एखादा दृष्टीचा समुदाय असल्यासारखे वाटत आहे.

सा मे श्रियं दिशतु सागरसम्भवायाः- सागर संभवा अर्थात समुद्रातून जन्माला आलेली. समुद्रमंथनाच्या दिव्य प्रसंगात समुद्रातून जी चौदा रत्ने प्रगटली यामध्ये आई महालक्ष्मी चे वर्णन आहे. त्याचा संदर्भ वापरत आचार्य श्री म्हणतात ,समुद्रातून प्रकट झालेल्या आई महालक्ष्मीची ती दृष्टी मला वैभव प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७०) श्री कनकधारा स्तोत्रम्- ३

विश्वामरेन्द्रपदविभ्रमदानदक्ष-
मानन्दहेतुरधिकं मुरविद्विषोऽपि ।
ईषन्निषीदतु मयि क्षणमीक्षणार्ध-
मिन्दीवरोदरसहोदरमिन्दिरायाः ।। ३ ।।

आई महालक्ष्मीच्या त्या नेत्र कटाक्षाचा अद्भुत महिमा सांगताना आचार्यश्री म्हणतात,

विश्वामरेन्द्रपदविभ्रमदानदक्षम्- विश्व अर्थात जग. अमर अर्थात देवता. इंद्र अर्थात सर्वश्रेष्ठ, राजा. त्याचे पद म्हणजे अधिकार. अर्थात या जगाचाच नव्हे तर देवांचाही राजा असलेल्या इंद्राच्या पदाचा अधिकार. आई जगदंबेच्या नेत्र कटाक्षाने असे देवराज इंद्राचे पद देखील सहज मिळू शकते. मग सामान्य प्राप्तीची कथा ती काय?

आनन्दहेतुरधिकं मुरविद्विषोऽपि- मूर नावाच्या राक्षसाचे विद्विष् अर्थात शत्रू असणाऱ्या भगवान श्री विष्णूंना देखील अधिक आनंद देणारा असा हा नेत्रकटाक्ष आहे. 'श्रीहरींना देखील' हा उल्लेख मोठा महत्वाचा आहे. भगवंताचे स्वरूप आनंदरूप आहे. त्यांना बाहेरून आनंद मिळण्याची आवश्यकता नाही. त्यांना देखील आनंद मिळतो. मग सामान्य दुखी जीवांना किती आनंद देत असेल? याचा विचार जागवणारा हा उल्लेख.

इन्दीवरोदरसहोदरमिन्दिरायाः- इंदीवर म्हणजे निळ्या रंगाचे कमळ. त्याचे उदर म्हणजे आपला गाभा. सहोदर अर्थात त्याच्या सौंदर्यासमान असणारा असा देवी इंदिरा म्हणजे आई लक्ष्मी चा नेत्रकटाक्ष आहे.

ईषन्निषीदतु मयि क्षणमीक्षणार्धम् - शेवटी आचार्यश्री प्रार्थना करतात की आईचा तो दिव्य नेत्र कटाक्ष अर्ध क्षण का होईना माझ्यावर कृपादृष्टीवर्षाव करतो. कारण माझ्या उद्धारासाठी तेवढाही पर्याप्त आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७१) श्री कनकधारा स्तोत्रम् -४

आमीलिताक्षमधिगम्य मुदामुकुन्द-
मानन्दकन्दमनिमेषमनङ्गतन्त्रम्।
आकेकरस्थितकनीनिकपक्ष्मनेत्रं
भूत्यै भवेन्मम भुजङ्गशयनाङ्गनाया:।।४।।

आनंदकंद म्हणजे आनंदाचा जणू भरगच्च संग्रह. मुकुंद म्हणजे मुक्ती देणारे, भगवान श्रीहरी. त्यांना मुदा म्हणजे आपल्याच आनंदात, आमीलिताक्षमधिगम्य डोळे मिटून शांत पहुडलेले पाहून,

अनिमेषमनङ्गतन्त्रम्- अनिमिष अर्थात पापणी देखील न लवता. अनंग म्हणजे भगवान मदन. त्यांचे तंत्र म्हणजे प्रेम.

सगळ्याचा एकत्रित विचार करता आनंदकंद भगवान श्रीहरी आपल्याच आनंदात नेत्र मिटून बसलेले आहे असे पाहून, आता ते पहात नसल्याने त्यांच्याकडे अनिमिष नेत्राने जी पाहत आहे आणि तसे पाहिल्याने जिच्यामध्ये प्रेमभाव ओतप्रोत भरला आहे. अशी आईची दिव्यदृष्टी आहे.

आकेकरस्थितकनीनिकपक्ष्मनेत्रं- आकेकर म्हणजे डोळ्याचा किनारा. कनीनिक म्हणजे डोळ्यातील पुतळी तर पक्ष म्हणजे पापण्या.

भगवान श्रीविष्णु आपल्याकडे पहात नाही असे म्हटल्यावर आई महालक्ष्मीची लज्जा थोडी दूर झाली आहे. त्यामुळे आता ती टक लावून भगवंताकडे पहात आहे. इतर वेळा जेव्हा ती भगवंताकडे पाहते त्यावेळी प्रेमभाव तर जागृत होतो पण श्रीहरींनी तिच्याकडे पाहिल्यावर त्याची जागा लज्जा घेते. त्या स्त्रीसुलभ लज्जेने आईचे नेत्र खाली वळतात.मात्र आता ते पाहत नसल्याने ती त्यांच्याकडे टक लावून पहात आहे. आता फक्त प्रेमभाव आहे.

अशा वेळी तिच्या पापण्या अविचल आहेत आणि डोळ्यातील बुबुळे नेत्रांच्या कडांशी स्थिर झाली आहेत.

भुजङ्गशयनाङ्गनाया:- भुजंग अर्थात महासर्प. शेषनाग. त्याच्यावर जे शयन करतात त्यांची अंगणा म्हणजे पत्नी असणाऱ्या देवी लक्ष्मीचे ते नेत्र कटाक्ष,

भूत्यै भवेन्मम- माझ्या कल्याणाला कारणीभूत होवोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७२) श्री कनकधारा स्तोत्रम् -५

बाह्वन्तरे मधुजित: श्रितकौस्तुभेया हारावलीव हरिनीलमयी विभाति।

कामप्रदा भगवतोऽपि कटाक्षमाला

कल्याणमावहतु मे कमलालयाया:।।५।।

बाह्वन्तरे- बाहू म्हणजे हात. त्यांच्या अंतरे म्हणजे आत मध्ये. दोन हातांच्या आत असणारा अवयव म्हणजे छाती.

मधुजित:- मधु नावाच्या राक्षसाला जिंकणारे. भगवान श्रीविष्णु.

विश्व रचनेच्या आरंभी भगवान श्रीविष्णूच्याच कानातून निघालेल्या मळा च्या दोन थेंबांमधून मधु आणि कैटभ या नावाचे दोन राक्षस जन्माला आल्याची कथा आहे. त्यांच्याशी युद्ध करून श्रीविष्णूंनी त्यांना मारले.

श्रितकौस्तुभेया- कौस्तुभ हे भगवान विष्णूच्या गळ्यातील रत्नाचे नाव. त्याने अलंकृत.

एकत्रित अर्थ पाहता, मधू राक्षसाचे विनाशक भगवान श्रीविष्णूंच्या वक्षस्थलावर रुळणाऱ्या कौस्तुभ मण्याने अलंकृत.

आई जगदंबेची दृष्टी वारंवार भगवान श्रीहरीच्या हृदयावर जात असल्याने तेथे असणाऱ्या कौस्तुभमण्याने ती दृष्टी अलंकृत होते असा भाव.

हारावलीव हरिनीलमयी विभाति- हरी म्हणजे हिरवा तर नील म्हणजे निळा. हिरवे रत्न पाचू तर निळे रत्न नीलम. महालक्ष्मी चे डोळे तसे हिरवट निळे आहेत. जणु त्या मण्यांची माळ तयार केली तर ती जशी दिसेल तशी आईची कटाक्ष मालिका विभाति म्हणजे शोभून दिसत आहे.

कामप्रदा भगवतोऽपि कटाक्षमाला- भगवंताला देखील जी काम म्हणजे प्रेमभावना प्रदान करते अशी ती कमलालयाया:- कमळामध्ये निवास करणाऱ्या आई महालक्ष्मीची कटाक्षमाला- वारंवार टाकलेले कटाक्ष यांची जणू माला.

कल्याणमावहतु मे - मला कल्याण प्रदान करणारी होवो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७३) श्री कनकधारा स्तोत्रम् -६

कालाम्बुदालिललितोरसि कैटभारे-
धाराधरे स्फुरति या तडिदंगनेव्।
मातु: समस्त जगतां महनीय मूर्ति
भद्राणि मे दिशतु भार्गवनन्दनाया:।।६।।

कालाम्बुदालिललितोरसि कैटभारे- अंबु म्हणजे पाणी. ते देणारा तो अंबुद म्हणजे ढग. ढगांचा खरा काळ पावसाळा. त्या काळातील ढग काळेशार असतात. त्यांची अली म्हणजे रांग. एकामागोमाग एक आल्यामुळे विशाल समूह वाटणाऱ्या आणि अत्यंत काळेशार दिसणाऱ्या.

कैटभारे:- कैटभ नावाच्या राक्षसाचे अरि म्हणजे शत्रू अर्थात भगवान श्रीविष्णु, त्यांच्या उरसि म्हणजे छातीवर.

धाराधरे स्फुरति या तडिदङगनेव्- धारा म्हणजे जलधारांना धारण करणारा म्हणजे मेघ. यावर तडीत अंगणा म्हणजे मेघाची विद्युत रूपी पत्नी. इव स्फुरति- ज्याप्रमाणे चकाकणारी, सौंदर्यपूर्ण दिसणारी.

एकत्रित पाहता, मेघावर चमकणाऱ्या विजेप्रमाणे भगवान श्री विष्णूंच्या काळ्याशार वक्षस्थलावर मस्तक ठेवल्यावर अधिकच सौंदर्यपूर्ण दिसणारी.

हे सौंदर्य पहायचे असेल तर एखाद्या सोनाराच्या दुकानात जावे. तेथे असलेल्या कसोटीच्या दगडावर उमटलेली सोन्याची रेघ आई लक्ष्मीचे स्वरूप असते. कसोटीचा दगड शाळीग्राम असतो . अर्थात भगवान विष्णू.

मातु: समस्त जगतां - सगळ्या जगाची आई असणाऱ्या महालक्ष्मीची,

महनीय मूर्ति- अत्यंत श्रेष्ठ अशी मूर्ती म्हणजे प्रगट झालेली दृष्टी, भार्गवनन्दनाया:- महर्षी भृगु आणि त्यांची पत्नी दक्षकन्या ख्याती यांच्या तपश्चर्येने देवी लक्ष्मीने त्यांच्या आश्रमात अवतार धारण केला. त्या संदर्भाने भार्गव कुळाला आनंद प्रदान करणारी दृष्टी,

भद्राणि मे दिशतु - मला कल्याणकारक बाबी प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७४) श्री कनकधारा स्तोत्रम् -७

प्राप्तं पदं प्रथमतः किल यत्प्रभावान्
मांगल्य भाजिः मधुमाथिनि मन्मथेन।
मय्यापतेत्दिह मन्थर मीक्षणार्द्धं
मन्दालसं च मकरालयकन्यकायाः।।७।।

प्राप्तं पदं प्रथमतः किल यत्प्रभावान्- पद शब्दाचा अर्थ स्थान. प्राप्त म्हणजे उपलब्ध होणे. प्रथमतः अर्थात पहिल्याच वेळी. किल यत्प्रभावात् अर्थात तिच्या प्रभावामुळे.

मांगल्यभाजि- अर्थात सकलम मंगलाचे पात्र, अधिष्ठान असणारे.

मधुमाथिनि- मधु नावाच्या दैत्याचे मथन अर्थात विनाश करणारे जे भगवान विष्णू त्यांच्यात, अर्थात त्यांच्या हृदयात

मन्मथेन- भगवान कामदेवाने, मदनाने.

एकत्रित अर्थ पाहता जिच्या प्रभावामुळे मध्वरी भगवान विष्णूंच्या हृदयात मदनाला पहिल्यांदा स्थान मिळाले अशी.

आई महालक्ष्मी मुळेच भगवान विष्णूंचा मनात प्रथम प्रेमभाव निर्माण झाला अशी.

तिच्या शिवाय अन्य कोणत्याही स्त्रीला भगवान विष्णूच्या हृदयात स्थानच नाही आणि तिच्यामुळे पहिल्यांदाच भगवान विष्णूंच्या मनात प्रेमभाव निर्माण झाला असल्याने पहिले प्रेम रूपात भगवान विष्णूची अत्यंत प्रिय असणारी देवी लक्ष्मी. तिची ती अत्यंत प्रभावशाली दृष्टी, मन्थरम्- वळणदार. इतर वेळा या शब्दाचा अर्थ वाकडी असा होतो. आईच्या नजरेतील कटाक्ष वक्रता येथे अपेक्षित आहे.

ईक्षणार्द्धं- अर्धवट दृष्टी. अर्धोन्मिलित नेत्र कटाक्ष.

मन्दालसं - मंद अर्थात हळुवार. आलस अर्थात जडावलेली.

व्यक्ती जेव्हा भोजनादिक तृप्ती दायक गोष्टींनी तृप्त होऊन आपल्याच आनंदात रममाण असते त्यावेळी तिची दृष्टी अशी मंद आलस युक्त होते. आई महालक्ष्मी परम तृप्त असल्याने तिची दृष्टी अशी आहे. मकरालयकन्यकायाः- मकर म्हणजे मगर. समस्त जलचर प्राण्यांचे प्रतीक. त्यांचे आलय म्हणजे राहण्याचे स्थान अर्थात समुद्र. त्याची कन्या ती मकरालयकन्यका.

तिची ती प्रेमळ दृष्टी

मय्यापतेत्दिह- येथे माझ्यावर वर्षाव करो.



## श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
[illegible]

७५) श्री कनकधारा स्तोत्रम् -८

दद्याद्दयानुपवनो द्रविणाम्बुधाराम- स्मिन्नकिञ्चन विहङ्ग शिशौ विषण्णे।
दुष्कर्मधर्ममपनीय चिराय दूरं
नारायणप्रणयिनीनयनाम्बुवाहः।।८।।

आई भगवतीच्या कृपादृष्टी वर्षावाचा विचार मनात आल्यानंतर पूज्यपाद आचार्यश्री त्या वर्षावाशी संबंधित अन्य गोष्टींचा विचार एकत्रित करून उपमासौंदर्य साधत आहेत.

नारायणप्रणयिनीनयनाम्बुवाहः- हा मेघ सामान्य नाही. आई जगदंबेच्या कृपादृष्टीचा हा मेघ. कशी आहे आई जगदंबा, तर नारायण प्रणयिनी. भगवान श्री विष्णूची प्रियतमा. त्यातही नारायण शब्द वापरणारी आचार्यश्रींची प्रतिभा अलौकिक.

नारा म्हणजे पाणी. त्यात जे अयन म्हणजे निवास करतात ते नारायण.

मेघ जरी जल वर्षाव करीत असला तरी ते जल मूलतः समुद्राचे.

त्या आदिमायेची कृपा मुळात मायापती परब्रह्माची. किती सहजरीत्या आचार्य हा सिद्धांत सांगताहेत.

दयानुपवनो- हा मेघ दया रुपी पवन म्हणजे वाऱ्याच्या मागोमाग येतो. अर्थात आधी आई जगदंबेच्या मनात भक्तांच्या प्रति दया भाव जागृत होतो आणि मग कृपादृष्टी रुपी मेघ अवतरित होतो.

अस्मिन्नकिञ्चन- आचार्य स्वतःला अकिंचन याचा अर्थ अन्य कोणताही मार्ग नसलेले म्हणत आहेत.

विहङ्ग शिशौ- मेघाचा विषय असल्यामुळे येथे विहंग म्हणजे पक्षी याचा संबंध चातकाशी आहे. त्यातही त्याचा शिशू अर्थात पूर्ण परावलंबी. विषण्णे- त्यामुळे दुःखी, हतबल झालेला.

दुष्कर्मधर्ममपनीय चिराय दूरं- मेघ नसला की प्रचंड गर्मी होते. त्याचा त्रास होतो. तसा आईच्या कृपे पासून दूर असलेला जीव दुष्कर्म करतो. त्याचा परिणाम म्हणून दुःख रूपी घर्म अर्थात घाम येतो. तो दूर करून आईची दृष्टी,

दद्याद् द्रविणाम्बुधाराम- मला कृपा रुपी धनाची, शांत करणारी जलधारा प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७६) श्री कनकधारा स्तोत्रम् -९

इष्टाविशिष्टमतयोऽपि यया दयार्द्र-
दृष्ट्या त्रिविष्टपपदं सुलभं लभन्ते।
दृष्टिः प्रहृष्टकमलोदरदीप्तिरिष्टां
पुष्टिं कृषीष्ट मम पुष्करविष्टरायाः।।९।।

इष्टाविशिष्टमतयोऽपि- इष्ट म्हणजे आवश्यक असलेली. विशिष्ट अर्थात योग्य प्रकारची.

त्याला अ उपसर्ग लावला. अर्थात विशिष्ट प्रकारची नसलेली.

मती म्हणजे बुद्धी.

अपि म्हणजे सुद्धा.

एकत्रित अर्थ केला तर 'आवश्यक असणारी विशिष्ट प्रकारची बुद्धी नसली तरीसुद्धा.'

यया दयार्द्रदृष्ट्या- जिच्या दयापूर्ण दृष्टीने.

त्रिविष्टपपदं - स्वर्गातील स्थान.

सुलभं लभन्ते- सहजतेने प्राप्त होते.

अर्थात आई महालक्ष्मीच्या दयापूर्ण दृष्टीने ज्यांच्याजवळ स्वर्गात जाण्यासाठी आवश्यक बुद्धी नाही. तितकी ज्यांची पुण्य कर्मे नाहीत त्यांना देखील सहजपणे स्वर्गाचे स्थान प्राप्त होते.

स्वर्गात जाण्यासाठी पुण्य करणे आवश्यक आहे. त्यासाठी विशिष्ट प्रकारची बुद्धी असावी लागते. शास्त्राचे,यज्ञयागाचे ज्ञान असावे लागते. मात्र आईची कृपा झाली तर असे ज्ञान नसणाऱ्यांना सुद्धा, याच जगात धनसंपत्तीच्या आधारे स्वर्गीय आयुष्य जगता येते. हा भाव.

कशी आहे ती दृष्टी? तर प्रहृष्टकमलोदरदीप्तिरिष्टां- प्रहृष्ट अर्थात पूर्णपणे फुललेल्या,

कमलोदर म्हणजे कमळाच्या आतील गाभ्याप्रमाणे.

दीप्तिरिष्टां- म्हणजे सौंदर्याने युक्त असलेली.

अर्थात कमळाच्या

आत असणाऱ्या गाभ्याप्रमाणे परम कोमल, आकर्षक, रसपूर्ण अशी आईची दृष्टी आहे.

पुष्करविष्टरा- पुष्कर म्हणजे कमळ. तर विष्टर म्हणजे आसन. अर्थात कमळावर बसलेल्या, त्या आई महालक्ष्मीची दृष्टी,

पुष्टिं कृषीष्ट मम - मम म्हणजे माझे, पुष्टी म्हणजे कल्याण, कृषीष्ट म्हणजे करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७७) श्री कनकधारा स्तोत्रम् -१०

गीर्देवतैति गरुड़ध्वज सुंदरीति
शाकम्भरीति शशिशेखर वल्लभेति।
सृष्टि-स्थिति-प्रलय केलिषु संस्थितायै तस्यै
नमस्त्रिभुवनैकगुरोस्तरूण्यै ।।१०।।

आई आदिशक्ती परांबेचे कार्य तीन प्रकारे चालत असते. या तीन पद्धतींनाच त्रिगुण असे म्हणतात. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या द्वारे कार्य करणाऱ्या आदिशक्तीच्या तीन रूपांना महाकाली, महालक्ष्मी आणि महासरस्वती असे म्हणतात.

या तीन रूपात कार्य करणाऱ्या तीन शक्तींचे वर्णन येथे आचार्यश्री करीत आहेत.

गीर्देवतैति- गीरा म्हणजे वाणी. त्या वाणीची देवता ती गीर्देवता. अर्थात आई सरस्वती.

गरुड़ध्वज सुंदरीति - गरुडध्वज म्हणजे भगवान विष्णू. त्यांच्या रथाच्या ध्वजावर गरुडाचे चित्र काढलेले असते.

त्यांची सुंदरी अर्थात प्रियतमा. म्हणजे आई जगदंबा महालक्ष्मी.

शाकम्भरीति - जगदंबेचे एक नाव शाकंबरी असे आहे. कधीकाळी प्रचंड मोठा दुष्काळ पडला होता. त्यावेळी सर्व ऋषी-मुनींनी प्रार्थना केल्यामुळे आई जगदंबा प्रगट झाली.

सगळ्या भक्तांच्या उदरभरणाची सोय व्हावी म्हणून तिने सर्वत्र शाक अर्थात भाज्या निर्माण केल्या.

याच्या आधारे भक्तांचे भरणपोषण केल्यामुळे हे नाव रूढ झाले.

शशिशेखर वल्लभेति- शशि म्हणजे चंद्र. त्याला शेखर म्हणजे मस्तकावर धारण करणारे. अर्थात भगवान श्री शंकर.

त्यांची वल्लभा अर्थात प्रियतमा. म्हणजे देवी पार्वती.

सृष्टि स्थिति प्रलय केलिषु संस्थितायै- या तीन स्वरूपात, त्या त्रिदेवांसह, सृष्टी निर्मिती, स्थिती अर्थात पालन आणि लय अर्थात विनाश या तीनही केली म्हणजे लीलांमध्ये आधारभूत स्वरूपात विद्यमान असणाऱ्या,

तस्यै नमस्त्रिभुवनैकगुरोस्तरूण्यै- त्या त्रिभुवनैकगुरू अर्थात त्रैलोक्यातील सर्व श्रेष्ठ तत्व असणाऱ्या भगवान विष्णूंची तरुणी अर्थात सुंदरीला नमस्कार असो.



## श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२५४४५११

७८) श्री कनकधारा स्तोत्रम् -११

श्रुत्यै नमोऽस्तु शुभकर्मफल प्रसूत्यै रत्यै नमोऽस्तु रमणीय गुणार्णवायै।

शक्त्यै नमोऽस्तु शतपत्रनिकेतानायै पुष्ट्यै नमोऽस्तु पुरूषोत्तम वल्लभायै।।११।।

विविध रूपामध्ये भक्त कल्याणाचे कार्य करणाऱ्या श्रीमहालक्ष्मीच्या चार विविध रूपांचे वर्णन आचार्यश्री येथे करीत आहेत.

श्रुती, रती, शक्ती आणि पुष्टी अशा चार रूपात आई जगदंबेचे कार्य चालते.

त्यांना वंदन करतांना आचार्यश्री त्यांच्या कार्याचे स्वरूपही स्पष्ट करीत आहेत.

श्रुत्यै नमोऽस्तु- आईच्या श्रुती स्वरूपाला नमस्कार असो.जी,

शुभकर्मफल प्रसूत्यै- शुभ कर्माचे फळ निर्माण करते.

शुभ, पवित्र, पुण्यदायक कार्याचे मार्गदर्शन वेदात, शास्त्रात दिलेले असते. याच कारणाने वेदाला श्रुती म्हणतात.

रत्यै नमोऽस्तु- जगदंबेच्या रती स्वरूपाला नमस्कार असो. रती म्हणजे आवड. मानवाला कशाची आवड असावी? तर

रमणीय गुणार्णवायै- रमणीय अर्थात आनंददायक. गुणार्णव म्हणजे गुणांचा सागर.

तशी अपार गुणसागर असणारी आई महालक्ष्मी भक्तांच्या मनात रती रूपात कार्य करते.

शक्त्यै नमोऽस्तु- आईच्या शक्ती स्वरूपाला नमस्कार असो. जी शतपत्रनिकेतानायै- शतपत्र अर्थाची शेकडो पाकळ्यांचे कमळ. त्यामध्ये निवास करणारी.

एवढं जसे महालक्ष्मीच्या रूपाचे आहे तसेच मूल बुद्धी स्वरूपाचे आहे.

मानवी मेंदू मध्ये असणाऱ्या सहस्त्रार चक्रात निवास करणाऱ्या आदिशक्तीचे ते वर्णन आहे.

पुष्ट्यै नमोऽस्तु- भगवती पुष्टीला वंदन असो.जी

पुरूषोत्तम वल्लभायै- भगवान पुरुषोत्तम अर्थात श्रीविष्णूंची वल्लभा अर्थात प्रियतमा आहे.



## श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

७९) श्री कनकधारा स्तोत्रम्- १२

नमोऽस्तु नालीकनिभाननायै
नमोऽस्तु दुग्धौदधिजन्मभूम्यै ।
नमोऽस्तु सोमामृतसोदरायै
नमोऽस्तु नारायणवल्लभायै।।१२।।

आई जगदंबा महालक्ष्मीला वंदन करताना जगद्गुरु श्री आदि शंकराचार्य स्वामी महाराज विविध विशेषणांचा उपयोग करीत आहेत.

त्यातून आई जगदंबेच्या विविध गुणांचे वैभव विशद करीत आहेत.

आचार्य श्री म्हणतात,

नमोऽस्तु नालीकनिभाननायै- नालीक शब्दाचा अर्थ आहे कमळ. नाल म्हणजे पोकळ दांडी, त्यावर ते फुलत असल्यामुळे त्याला नालीक असे म्हणतात.

निभ अर्थात प्रमाणे, सारखे तर आनन म्हणजे मुख.

अर्थात जिचे मुख कमळाप्रमाणे अतीव आकर्षक आहे अशी.

तिला नमोऽस्तु अर्थात नमस्कार असो.

नमोऽस्तु दुग्धौदधिजन्मभूम्यै- दुग्ध म्हणजे दूध. उदधि म्हणजे सागर. दुधाचा सागर अर्थात क्षीरसमुद्र ही जिची जन्मभूमी आहे अशी.

समुद्रमंथन कथेचा संदर्भ यात घेतलेला आहे. उद म्हणजे पाणी आणि धी म्हणजे साठा या अर्थाने सागराला उदधी म्हणतात. पृथ्वीवर आढळणाऱ्या सामान्य पाण्याच्या समुद्राप्रमाणे पुराणात दुग्धसागर,दधिसागर इक्षुसागर,मधुसागर यांचेही वर्णन आहे.

यापैकी क्षीर म्हणजे दुधाच्या सागरातून समुद्रमंथन प्रसंगी महालक्ष्मी प्रगटली आहे. त्यामुळे सागर ही तिची जन्मभूमी.

नमोऽस्तु सोमामृतसोदरायै- याच सागर मंथनातून सोम म्हणजे चंद्र आणि अमृत निघाले असल्याने त्यांची सोदरा अर्थात एकाच उदरातून जन्माला आलेली, बहीण.

नमोऽस्तु नारायणवल्लभायै- भगवान श्री नारायण यांची वल्लभा अर्थात प्रियतमा असणाऱ्या आई महालक्ष्मीला नमस्कार असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८०) श्री कनकधारा स्तोत्रम् -१३

सम्पत्कराणि सकलेन्द्रिय नन्दनानि साम्राज्यदान विभवानि सरोरूहाक्षि।

त्वद्वंदनानि दुरिताहरणोद्यतानि मामेव मातरनिशं कलयन्तु मान्ये।।११३।।

मान्ये- हे सगळ्यांना मान्य अर्थात वंदनीय असणाऱ्या आई जगदंबे! सर्वसामान्य मानवच नव्हे तर ईश्वर महेश्वर देखील जिच्या योग्यतेचा सन्मान करतात अशी.

सरोरूहाक्षि- हे कमलनयने. सर म्हणजे तलाव. त्यात उरुह म्हणजे जन्माला येऊन वर येणारे. अर्थात कमळ. तसे जिचे अक्ष म्हणजे डोळे आहेत अशी. येथे केवळ आकाराच नव्हे तर गुणांचाही विचार आहे. ते कमळ जसे भुंग्यांना आकर्षित करते तशी जिची कृपादृष्टी साधकांना आकर्षित करते, अशी.

त्वद्वंदनानि- तुला केलेली वंदने अर्थात नमस्कार, प्रार्थना.

कशासाठी करायची ही प्रार्थना? तर ही प्रार्थना अलौकिक फलदायी आहे. ही प्रार्थना काय काय देते? याचे वर्णन करताना पूज्यपाद आचार्य श्री म्हणतात,

सम्पत्कराणि- सकल संपत्तीला उपलब्ध करून देणारी. जिच्या कृपेने बाह्य जगतातील धनसंपत्ती आणि अंतर्मनातील शम,दम इत्यादी षट् संपत्ती, साधकांना प्राप्त होते अशी.

सकलेन्द्रिय नन्दनानि- सकल इंद्रियांना आनंद देणारी. बाह्य जगतातील पंचकर्मेंद्रिये, पंचज्ञानेंद्रिय आणि अंतर्गत इंद्रिय मन अशा अकराही इंद्रियांना आनंद देणारी.

शब्द, स्पर्श इ. पाचही पद्धतीने प्राप्त होणारे सर्व आनंद प्रदान करणारी. त्या आनंदाला साधनीभूत होणारी साधने प्रदान करणारी.

साम्राज्यदान विभवानि- आपल्या भक्तांना साम्राज्य दान देण्याचे वैभव असणारी.

दुरिताहरणोद्यतानि- दुरित अर्थात पाप, वाईट ,अमंगल. त्याचे हरण करण्यास म्हणजे नष्ट करण्यास उद्यत म्हणजे कायम सिद्ध असणारी.

अशी ही आईची वंदना,

मामेव- माझ्यावरच, मलाच.

मातरनिशं - हे माते अनिश अर्थात सतत.

कलयन्तु- प्राप्त होत राहो.

अर्थात अशा सर्व अद्वितीय गुणांनी युक्त असणारी ही वंदना सतत करण्याची शक्ती मला प्राप्त होवो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८१) श्री कनकधारा स्तोत्रम् -१४

यत्कटाक्षसमुपासना विधिः
सेवकस्य सकलार्थ सम्पदः।
संतनोति वचनाङ्गमानसै-
स्त्वां मुरारिहृदयेश्वरीं भजे।।१४।।

या जगात भक्तासाठी करण्यासारखे एकमेव कार्य काही असेल तर ते केवळ आणि केवळ महालक्ष्मीची उपासना हेच आहे. अशी अनन्यशरणता सांगत आचार्यश्री येथे आई जगदंबेचे वैभव स्पष्ट करीत आहेत.

ते म्हणतात,

यत्कटाक्षसमुपासना विधिः- त्या आई जगदंबेच्या कटाक्षाच्या उपासनेचा विधिच,

सेवकस्य सकलार्थ सम्पदः- तिचा सेवकांना सर्व अपेक्षित संपत्तीला

संतनोति- वृद्धिंगत करणारा आहे.

आई महालक्ष्मीच्या कृपेनेच साधकाला जे जे हवे ते सर्व प्राप्त होऊ शकते. त्याच्या सर्व प्रकारच्या संपत्तींचा विकास होतो.

येथे त्या कटाक्षां ची उपासना करावी असे म्हटले आहे. मूर्तीची उपासना ठीक आहे. पण कटाक्षांची उपासना कशी करायची? तर उपासनेचे अंतीम फल आहे, उपास्य देवतेचे आपल्याकडे लक्ष जाणे. ते लक्ष जाणे म्हणजे तिने पाहणे. म्हणजे कटाक्ष.

ती केव्हा पाहील ?तर तिला आवडती गोष्ट असेल त्यावेळी. तिला आवडती गोष्ट कोणती? तर भगवान श्रीहरी.

सोप्या शब्दात आपल्या हृदयात श्रीहरींचे स्थान असेल तर आईची कृपादृष्टी आपल्यावर पडेल.

यासाठी,

मुरारि-मुर नामक राक्षसाचे शत्रु श्रीहरी. कृतयुगामध्ये नाडीजंघ नावाच्या राक्षसापासून मुर नावाचा राक्षस जन्माला आल्याची कथा आहे.

त्याचे आणि भगवान विष्णूंचे प्रचंड युद्ध झाले. ज्यात तो मरेना. त्यावेळी थकून हिमालयात विश्राम करणाऱ्या विष्णूंच्या शरीरातून निघालेल्या शक्तीने त्याचा विनाश केल्याची कथा आहे.

त्या शक्तीला पुढे उत्पन्ना एकादशी असे नाव पडले. अशा त्या मुर विनाशक श्रीहरींची,

हृदयेश्वरीं- हृदयाची स्वामिनी असणाऱ्या,

त्वां- तुला,

वचनाङ्गमानसै- वचन म्हणजे वाणीने, अंग म्हणजे शरीराने आणि मानसैः म्हणजे मनाने, अर्थात सर्व मार्गांने, परिपूर्णरीत्या

भजे- भजत असतो. उपासना करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८२) श्री कनकधारा स्तोत्रम्-१५

सरसिजनिलये सरोज हस्ते धवलतमांशुकगन्धमाल्यशोभे।
भगवति हरिवल्लभे मनोज्ञे त्रिभुवनभूतिकरि प्रसीद मह्यम्।।१५।।

आई जगदंबेला प्रसन्नतेची प्रार्थना करण्यासाठी पूज्यपाद आचार्यश्री तिचे गुण वैभव वर्णन करीत आहेत.

ते म्हणतात हे आई जगदंबे! तू कशी आहेस ? तर,

सरसिजनिलये- सरसिज म्हणजे कमळ तर निलये म्हणजे निवास करणारी.

आई जगदंबा कमळात निवास करते. इथे केवळ एका फुलाचा विचार नाही. ते प्रतीक आहे.

कमळ जसे चिखलात जन्माला येते, त्यानंतर पाण्यात वर चढते, पाण्याने स्वतःवरील चिखल काढते. त्यानंतर वर हवेत येते आणि सूर्याच्या दिशेने झेपावते. तशी ज्या साधकाची वृत्ती पार्थिवापासून तेजापर्यंत विकसित होत जाते, त्या साधकाच्या मनात निवास करणारी ती खऱ्या अर्थाने सरसिजनिलया.

सरोज हस्ते- हातात कमल धारण करणारी. अर्थात अशा वृत्तीने युक्त असणार्या साधकांना उन्नसाठी हात देणारी.

धवलतमांशुक- धवल म्हणजे पांढरे. त्याला तम प्रत्यय लावला. ज्यावेळी अनेक गोष्टीत तुलना करून ह्यापैकी सर्वश्रेष्ठ असे वर्णन करायचे असते त्यावेळी तम प्रत्यय लावतात.अर्थात धवलतम म्हणजे अत्यंत पांढरेशुभ्र,

अंशुक म्हणजे रेशमी वस्त्र.

गन्धमाल्यशोभे- गंध म्हणजे चंदनतिलक. माल्य म्हणजे मोत्यांच्या माळा.

या सगळ्यांनी शोभून दिसणारी.

भगवति- भग म्हणजे तेज, ऐश्वर्य. त्याने युक्त असणारी ती भगवती.

हरिवल्लभे- भगवान श्रीहरींची वल्लभा म्हणजे प्रियतमा.

मनोज्ञे- अत्यंत मनोहारी असणारी. भक्तांच्या मनात निवास करणारी. त्यांचे मन हरण करणारी. त्रिभुवनभूतिकरि- संपूर्ण त्रिभुवनाचे भूती म्हणजे कल्याण करणारी.

ती आई महालक्ष्मी,

प्रसीद मह्यम्- माझ्यावर प्रसन्न होवो. मला सर्व ऐश्वर्यदायक गोष्टी प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८३) श्री कनकधारा स्तोत्रम्- १६

दग्धिस्तिभि: कनकुंभमुखावसृष्टि
स्वर्वाहिनी विमलचारूजलप्लुताङ्गीम।
प्रातर्नमामि जगतां जननीमशेष लोकाधिनाथगृहिणी ममृताब्धिपुत्रीम्।।१६।।

दग्धिस्तिभि:- पुराणांतील अनेक संकल्पना पैकी संकल्पना आहे दिग्गज. पृथ्वीच्या आठ दिशेस हे आठ हत्ती असतात. त्यांच्या आधारावर पृथ्वी स्थिर असते.

ही संकल्पना प्रतिकात्मक आहे. सगुण-साकार गोष्टीला जग म्हणतात. याच्या विपरीत निर्गुण-निराकाराला गज असे म्हणतात.

अर्थात बाहेरून निराकार तत्त्वाच्या आधारे, सामान्य शब्दात निराधार स्वरूपात पृथ्वी असते.

प्रतीकरूपात स्वीकारलेले गज म्हणजे हत्ती हे समृद्धीचे सर्वोच्च टोक.

असे हत्ती दारात झुलत असणे श्रीमंतीचे सगळ्यात मोठे प्रतीक आहे. याला गजान्तलक्ष्मी म्हणतात.

असे हत्ती आपल्या शुंडांनी आई जगदंबेच्या मस्तकावर अभिषेक करतात.

हत्ती सामान्य असते तर त्यांचे घडे सामान्य असते आणि पाणी सुद्धा. येथे मात्र सर्वच अद्वितीय आहे. आचार्यश्री म्हणतात,

कनकुंभमुखावसृष्टि- त्यांनी आपल्या सोंडे मध्ये घेतलेले घडे सोन्याचे आहेत. त्या घड्यांचा मुखातून ती वर्षाव करत आहेत. कशाचा?

स्वर्वाहिनी- स्वर् वाहिनी अर्थात स्वर्गातून वाहणारी. देवी मंदाकिनी गंगा.

विमलचारूजल- तिचे विमल अर्थात अत्यंत शुद्ध तर चारु म्हणजे अत्यंत सुंदर, अशा जलाच्या द्वारे,

प्लुताङ्गीम- जिचे अंग ओलेचिंब झाले आहे अशी.

प्रातर्नमामि - त्या आई जगदंबे ला मी सकाळी वंदन करतो. येथे सकाळी म्हणताना दिवसाचे पहिले काम, हा अर्थ अपेक्षित आहे.

अर्थात आई जगदंबेची उपासना हेच आयुष्यातील प्राथमिक कार्य आहे.

जगतां जननीमशेष- अशेष म्हणजे संपूर्ण, जगाची जननी अर्थात माता. कशी आहे ही माझी माता?

लोकाधिनाथगृहिणी- हे लोक म्हणजे स्वर्ग, मृत्यु ,पाताळ. त्यांचे नाथ म्हणजे स्वामी अर्थात भगवान श्री विष्णू. त्यांची गृहिणी अर्थात प्रिय पत्नी. अमृताब्धिपुत्रीम्- अमृत अब्धि अर्थात दुधाचा समुद्र, क्षीरसागर. त्याच्यातून निर्माण झाली या अर्थाने त्याची पुत्री.

तिला वंदन असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८४) श्री कनकधारा स्तोत्रम् - १७

कमले कमलाक्षवल्लभे त्वं
करुणापूरतरङ्गतैरपाड़्गैः।
अवलोकय मामकिंचनानां
प्रथमं पात्रमकृत्रिमं दयाया : ।।१७।।

कमले- आई जगदंबेलाच येथे कमला असे म्हटलेले आहे. ती केवळ कमळावर बसली आहे एवढाच अर्थ नाही.

ती कमळाप्रमाणे उर्ध्वगामी वृत्तीची आहे. कमळाप्रमाणे सौंदर्यसंपन्न आहे. भक्तगणरुपी भुंग्यांच्या आकर्षणाचा विषय आहे.

त्वं - हे आई तू,

कमलाक्षवल्लभे - कमलाप्रमाणे अक्ष म्हणजे डोळे असणाऱ्या भगवान विष्णूंची वल्लभा म्हणजे प्रियतमा आहेस.

करुणा- कारुण्य अर्थात भक्तां बद्दलची दया.

पूर- त्याने परिपूर्ण असणारी. त्याचा जणू पूर आलेली. दया ओसंडून वाहत असलेली.

तरङ्गतैः - तरंगीत अर्थात चंचल असणाऱ्या,

अपाड़्गैः- डोळ्यांच्या कडांनी.

अवलोकय माम् - माझे अवलोकन कर. माझ्याकडे पहा.

अवलोकय

अकिंचनानां- तुझ्या भक्तीशिवाय माझ्याजवळ दुसरे काहीही नाही. त्या अर्थाने मी अकिंचन आहे. पूर्णपणे तुझ्यावरच आश्रित आहे.

प्रथमं पात्रम् - त्या दये साठी मी प्रथम पात्र आहे. हा शब्दच मोठा गोड आहे.

जशी अनेक गोष्टींची आवश्यकता तर अनेकांना असते. पण त्या गोष्टीचे वाटप करताना, सगळ्यात जास्त आवश्यकता ज्याला आहे त्याला प्रथम देण्यात येते.

त्यादृष्टीने मी प्रथम पात्र आहे. अर्थात तुझ्या दयेचा मी सर्वात अधिक गरजवंत आहे.

दुसरी गोष्ट जशी एखादी आई एखादा नवीन पदार्थ तयार केला तर घरातील सगळ्या लोकांच्या आधी आपल्या लाडक्या लेकराला देते. त्यादृष्टीने मी तुझा लेक असल्याने, तुझ्या दयेचा प्रथम अपात्र आहे.

कशी आहे ती दया?

अकृत्रिमं दयाया : - अकृत्रिम अर्थात अत्यंत शुद्ध. पवित्र. मूलभूत.

आईच्या दये मध्ये कोणत्याही अपेक्षेची भेसळ नाही. व्यवहारात केलेल्या मदती प्रमाणे परतफेडीची कृत्रिमता नाही.

अशी दया तू मला प्रदान कर.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८५) श्री कनकधारा स्तोत्रम् - १८

स्तुवन्ति ये स्तुतिभिरमिभिरन्वहं त्रयीमयीं त्रिभुवनमातरं रमाम्।
गुणाधिका गुरुतरभाग्यभागिनो भवन्ति ते बुधभाविताया:।।१८।।

स्तुतिभिरमिभि: - या स्तुतीच्याद्वारे, या स्तोत्राचा आधारे.

अन्वहं- अनु म्हणजे प्रत्येक आणि अह म्हणजे दिवस. अर्थात प्रत्येक दिवशी. नित्यनियमाने.

स्तुवन्ति ये- जे स्तुती करतात.

स्तवन नित्यनियमाने हवे. अडचण आल्यावर नाही.

त्रयीमयीं- त्रयी शब्दाचा एक अर्थ आहे तीन वेद. त्या ज्ञानाने युक्त असणारी.

त्रयी शब्दाचा दुसरा अर्थ आहे, सत्व,रज आणि तम यांची साम्यावस्था.

त्रयी शब्दाचा तिसरा अर्थ आहे, स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ यांचा समूह.

या सगळ्यांमध्ये परिपूर्ण व्यापलेली ती त्रयीमयी.

त्रिभुवनमातरं- तीनही भुवनांची, तेथील समस्त जीवांची माता.

रमाम्- संपूर्ण विश्वाला रममान करणारी.

अशा आई महालक्ष्मीची जे भक्त या स्तोत्राच्या द्वारे स्तुती करतात.

भवन्ति ते- ते होतात.

गुणाधिका- अधिक गुणसंपन्न. अर्थात विश्वातील समस्त जीवांपेक्षा अधिक गुणशाली. गुरुतरभाग्यभागिनो - गुरु तर म्हणजे अत्यंत श्रेष्ठ. अशा भाग्याचे, भाजन अर्थात पात्र.

अर्थात त्यांना सर्वाधिक श्रेष्ठ असे भाग्य प्राप्त होते.

बुधभाविताया:- बुध अर्थात ज्ञानी लोक. भावित अर्थातच कौतुक केलेले.

अर्थात आई जगदंबा, महालक्ष्मीच्या कृपेने या स्तोत्राचे पठण कर्ते विद्वान लोकांच्या कौतुकाला पात्र ठरतात.

भिक्षा मागायला गेल्यानंतर एका दरिद्री वृद्ध स्त्रीच्या परिस्थितीने गलबलून गेलेल्या पूज्यपाद आचार्यश्रींनी आई महालक्ष्मीची प्रार्थना केल्यानंतर ते ज्या गरीब वृद्ध महिलेच्या अंगणात उभे होते. तेथे असणाऱ्या आवळ्याच्या झाडांवरून सोन्याच्या आवळ्यांचा पाऊस पडला. त्या स्त्रीचे दारिद्र्य कायमचे दूर झाले.

अशी कथा या स्तोत्राच्या सोबत वर्णन केली जाते.